**सहायक कक्ष अधिकारी यांच्या कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीकरीता सन २०२२ मध्ये घेण्यात येणाऱ्या परीक्षेसाठी केवळ अनुत्तीर्ण (Repeater) असलेल्या उमेदवारांकडून अर्ज पाठविण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः परीक्षा-२१२१/प्र.क्र.५९/का-१७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

तारीख: २७ एप्रिल, २०२२

वाचा:-

1. **शासन परिपत्रक क्रमांकः परीक्षा-२१२१/प्र.क्र.५९/का-१७, दि. २२ डिसेंबर, २०२१**
2. **या कार्यासनाचे पत्र क्र. परीक्षा २१२१/प्र.क्र.५९/का.१७, दि. १४ मार्च, २०२२**
3. **शासन परिपत्रक क्रमांकः परीक्षा-२१२१/प्र.क्र.५९/का-१७, दि. २८ मार्च, २०२२**
4. **शासन निर्णय क्र.विपनि-२७२२/प्र.क्र.८/का.१७, दि. ५ एप्रिल, २०२२**
5. **शासन परिपत्रक क्रमांकः परीक्षा-२१२१/प्र.क्र.५९/का-१७, दि. १३ एप्रिल, २०२२**

**शासन परिपत्रक -**

कक्ष अधिकारी विभागीय परीक्षा-२०२२, या परीक्षेला प्रथमच बसणाऱ्या पात्र उमेदवारांचे विहित नमुन्यातील अर्ज समक्रमांकाच्या दि. २२ डिसेंबर, २०२१ च्या परिपत्रकान्वये मागविण्यात आले होते. आता जे सहायक कक्ष अधिकारी यापूर्वी झालेल्या कक्ष अधिकारी विभागीय परीक्षेत अनुत्तीर्ण झाले आहेत किंवा परीक्षेला अनुपस्थित राहीले आहेत अशा उमेदवारांचे विहित नमुन्यातील अर्ज या परिपत्रकान्वये मागविण्यात येत असून मंत्रालयाच्या इंट्रानेट वरील “आवेदन पत्र” या शिर्षाखाली अर्जाचा विहित नमुना उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

२. जे सहायक कक्ष अधिकारी यापूर्वी विभागीय परीक्षेला बसून सदर परीक्षेत सर्व विषयात अथवा काही विषयात अनुत्तीर्ण झाले आहेत किंवा परीक्षेला अनुपस्थित राहीले आहेत, अशा उमेदवारांना कक्ष अधिकारी विभागीय परीक्षा २०२२ ला बसावयाचे असल्यास केवळ त्यांचेच विहित नमुन्यातील अर्ज (त्या अर्जात उमेदवाराचे संपूर्ण नाव नमूद करून) प्रशासकीय विभागांच्या आस्थापना अधिकाऱ्यांनी अर्जातील सर्व तपशील बरोबर असल्याची खात्री करुन / प्रमाणित करुन या विभागाकडे निश्चितपणे दिनांक **१३ मे, २०२२** पर्यंत पोच होतील अशा पध्दतीने पाठवावेत . त्यानंतर प्राप्त झालेल्या अर्जांचा विचार करण्यात येणार नाही. विहित नमून्यातील अर्ज मंत्रालय इंट्रानेटवर “आवेदन पत्र” या मथळयाखाली उपलब्ध आहे.

३. संदर्भ क्र. ४ येथील दि. ०५ एप्रिल, २०२२ च्या शासन निर्णयानुसार कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीकरीताच्या विभागीय परीक्षेचा अभ्यासक्रम सुधारित करण्यात आलेला आहे. तथापि, या शासन निर्णयापूर्वीच्या अभ्यासक्रमानुसार आयोजित परीक्षेत काही विषयांमध्ये अनुत्तीर्ण असलेल्या सहायक कक्ष

अधिकाऱ्यांनी फक्त अनुत्तीर्ण विषयांसाठी जुन्या अभ्यासक्रमानुसार परीक्षा द्यावयाची असल्याने, संबंधित सहायक कक्ष अधिकाऱ्यांनी त्यांच्या आवेदनपत्रात त्यांना द्यावयाच्या पेपरचा क्रमांक व विषय इत्यादींचा उल्लेख अ.क्र.६ समोर स्पष्ट करावा. जुन्या अभ्यासक्रमानुसार यापुढे केवळ दोन परीक्षांचे आयोजन करण्यात येणार आहे याची सर्व अनुत्तीर्ण सहायक कक्ष अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

तथापि, जुन्या अभ्यासक्रमानुसार आयोजित परीक्षेत जे सहायक कक्ष अधिकारी संपूर्ण परीक्षेसाठी अनुपस्थित आहेत अथवा सर्व विषयांमध्ये अनुत्तीर्ण आहेत अशा सहायक कक्ष अधिकाऱ्यांनी सुधारित अभ्यासक्रमानुसार संपूर्ण परीक्षा द्यावयाची असल्याने त्यांनी त्यांच्या अर्जात अ.क्र. ६ समोर “सुधारित अभ्यासक्रमानुसार सर्व पेपर” असे स्पष्टपणे नमूद करावे.

४. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी सदर परिपत्रक संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांच्या (प्रतिनियुक्ती वर / रजेवर असलेल्या सहायक कक्ष अधिकारी यांच्या सह) कृपया लेखी स्वरुपात त्वरीत निदर्शनास आणावे व त्यांची स्वाक्षरी घेऊन, ती कागदपत्रे आपल्या अभिलेखात जतन करुन ठेवावीत. एखाद्या पात्र उमेदवाराचा अर्ज छाननी करुन विहित मुदतीत या कार्यासनास प्राप्त झाला नाही किंवा या कार्यासनास प्राप्त झालेला अर्ज अपूर्ण असल्यास अशा अर्जांची दखल घेतली जाणार नाही व त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित उमेदवार आणि त्या विभागाची राहील याची कृपया नोंद घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०४२७११४४३७८८०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sangita Anant Tanksale

Digitally signed by Sangita Anant Tanksale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c282c2610bd9cdd5979909e26290aff1e88aa7781d0760d4308f9802297609, cn=Sangita Anant Tanksale
Date: 2022.04.27 11:45:51 +05'30'

**(संगीता अ. टांकसाळे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
२. सर्व कक्ष अधिकारी, मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
३. निवडनस्ती.